**येरवडा ता. हवेली जि. पुणे येथे नवीन औद्योगिक प्रशिक्षण संस्था स्थापन करण्यासाठीच्या अभ्यासक्रमास, पदनिर्मितीस व त्यासाठी आवश्यक खर्चास मान्यता देणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : व्हीआयपी- २०२०/प्र.क्र.८४/व्यशि-३**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : १७ मे, २०२३

**वाचा** : १) उच्च व तंत्र शिक्षण विभाग शासन निर्णय क्र. आयटीआय २००८/(४९८/०८)/व्यशि-२ दिनांक १६.१२.२००८

२) उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्र. आयटीआय-२०१४/प्र.क्र.९४/व्यशि-३ दिनांक ०३.०७.२०१४

३) संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई यांचे क्र.०७/सीटीएस/येरवडा/२०२०/२९६ दिनांक १८.१२.२०२० चे पत्र

४) कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग, शासन निर्णय क्र.व्यशिअ-२०२०/प्र.क्र.१०२/व्यशि-१ दिनांक : ०७ एप्रिल, २०२२

**प्रस्तावना :**

महाराष्ट्र राज्य हे औद्योगिक दृष्टया प्रगत राज्य असून येथे नवीन औद्योगिक आस्थापनांनी आपल्या औद्योगिक उत्पादनांचा विस्तार केलेला आहे. पूणे जिल्हयामध्ये येरवडा व नगररोड या क्षेत्रात रांजणगाव व चाकण येथे औद्योगिक विकास महामंडळ (MIDC) आहे. या ठिकाणी आशिया खंडातील नामांकित उद्योगक्षेत्र असून फियाट, बजाज इलेक्ट्रीकल, एल.जी. इलेक्ट्रॉनिक्स, हायर इंडिया लि. येझाकी, बेकर गेजेस इ. ऑटोमोबाईल, मॅन्युफॅक्चरिंग, इलेक्ट्रीकल, इलेक्ट्रॉनिक्स या क्षेत्रातील उद्योग कार्यरत आहे.

पुणे शहराची वाढती लोकसंख्या व त्यामानाने पुणे शहरातील औद्योगिक प्रशिक्षण संस्थेमधील उपलब्ध मंजूर प्रवेशक्षमता लक्षात घेता प्रवेशोच्छुक उमेदवारांना प्रवेश मिळत नाहीत. त्यानुसार येरवडा येथे आधुनिक तंत्रज्ञानावर आधारित व स्थानिक गरजा तसेच मागणी विचारात घेऊन येरवडा येथे नवीन औद्योगिक प्रशिक्षण संस्था सुरु करण्यासाठी शासन निर्णय दिनांक १६ डिसेंबर, २००८ अन्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आलेली आहे.

उच्च व तंत्र शिक्षण विभाग शासन निर्णय दिनांक ०३ जुलै, २०१४ च्या शासन निर्णयान्वये शैक्षणिक वर्ष २०१४-१५ पासून सेंटर ऑफ एक्सलन्स बेसिक मॉडयुलच्या संलग्नित तुकडयांचे शिल्प कारागिर प्रशिक्षण योजनेंतर्गत येणाऱ्या व्यवसाय अभ्यासक्रमात रुपांतर करण्यास मान्यता देण्यात आलेली आहे. येरवडा ता. हवेली जि. पुणे येथे नवीन औद्योगिक प्रशिक्षण संस्था सुरु करण्यासाठी १८ व्यवसाय तुकडया व त्यासाठी आवश्यक २३ शिक्षकीय, ८ शिक्षकेतर व ९ चतुर्थश्रेणी/ पहारेकरी/सफाईगार हे बाह्ययंत्रणेव्दारे उपलब्ध करुन घ्यावयाचे मनुष्यबळ अशा एकूण ४० पदांना मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

उपरोक्त पार्श्वभूमीवर औद्योगिक प्रशिक्षण संस्था येरवडा जि. पुणे येथे १८ व्यवसाय तुकडया व त्याकरीता लागणाऱ्या एकूण २३ शिक्षकीय व ८ शिक्षकेतर व ९ बाह्ययंत्रणेव्दारे उपलब्ध करुन घ्यावयाच्या चतुर्थश्रेणी/पहारेकरी/सफाईगार या अशा एकूण ४० पदांना मान्यता देण्यात येत आहे.

सदर औद्योगिक प्रशिक्षण संस्थेमधील मान्यता देण्यात आलेल्या १८ व्यवसाय तुकडयांचा तपशिल प्रपत्र अ मध्ये व त्याकरीता लागणाऱ्या शिक्षक, शिक्षकेतर व चतुर्थश्रेणी,पहारेकरी व सफाईगार पदांचा तपशिल प्रपत्र ब मध्ये देण्यात आलेला आहे. येरवडा जि. पुणे येथील औद्योगिक प्रशिक्षण संस्थेतील पदांच्या वेतन व भत्यावरील खर्च तसेच बाह्ययंत्रणेव्दारे उपलब्ध करुन घ्यावयाच्या मनुष्यबळाचा खर्च हा नमूद लेखाशिर्षांतर्गत मंजूर अनुदानातून भागविण्यात येईल. मागणी क्र. झेडए-२,२२३०-कामगार व सेवायोजन,०३-प्रशिक्षण,००३-कारागिर व पर्यवेक्षक यांचे प्रशिक्षण,(०२) कारागिरांचे तांत्रिक व व्यावसायिक प्रशिक्षण,(०२)(०८)-प्रवेश क्षमता वाढविण्यासाठी औद्योगिक प्रशिक्षण संस्थांचा विस्तार करणे (२२३० ए २०९) (कार्यक्रम) (१०) कंत्राटी सेवा या लेखाशिर्षामधून भागविण्यात यावा.

शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्था येरवडा ता. हवेली, जि. पुणे या नवीन संस्थेची निर्मिती व त्याकरीता लागणाऱ्या एकूण ४० शिक्षक व शिक्षकेत्तर पदांना तसेच यंत्रसामुग्री, हत्यारे याकरीता सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात रू.५५५.६३ लाख व ४० शिक्षक व शिक्षकेतर पदांचे वेतन व इतर अनुषंगिक खर्चाकरीता प्रतिवर्षी रु.२२५.६३ लाख इतक्या खर्चास मान्यता देण्यात येत आहे. व याकरीता येणाऱ्या खर्चाचा तपशिल प्रपत्र क मध्ये देण्यात आलेला आहे.

सदर शासन निर्णय वित्त विभाग दिनांक १३.१२.२०२२ रोजीच्या उच्चस्तरीय सचिव समितीच्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SANGEETA AJIT SHINDE

Digitally signed by SANGEETA AJIT SHINDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SKILL DEVELOPMENT ENTREPRENEURSHIP AND EMPLOYMENT DEPARTMENT, 2.5.4.20=ba607066e7a34e428b7c7c73de0f7e09a315a2af5075fd47f1e08389aa137b81, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=DDF4C16E4A3043BBAA409E4ECF901CA0490CE93C66913DE88A7769927FF5E261, cn=SANGEETA AJIT SHINDE
Date: 2023.05.17 15:44:57 +05'30'

**( संगीता शिंदे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत ,**

१. मा. मंत्री, कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. प्रधान सचिव , कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग यांचे वरिष्ठ स्वीय सहायक , मंत्रालय,मुंबई
३. सहसचिव, कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग यांचे वरिष्ठ स्वीय सहायक , मंत्रालय,मुंबई
४. कक्ष अधिकारी, व्यशि-१, कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग, मंत्रालय, मुंबई
५.संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६. सहसंचालक,व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, पुणे (व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयामार्फत)
७. संबंधित जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी, ( व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयामार्फत )
८. निवड नस्ती. (व्यशि-३).

## प्रपत्र अ

## येरवडा, ता.हवेली, जि.पुणे येथे प्रस्तावित व्यवसाय अभ्यासक्रमांचा तपशिल

| अ. क्र. | व्यवसाय | तुकडयांची संख्या | प्रवेश क्षमता | यंत्रसामुग्री व हत्यारे एकूण खर्च (रु.लाखांत) (अंदाजित) | टूलकिट्स |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | कॉम्प्युटर ऑपरेटर ॲण्ड प्रोग्रॅमिंग असिस्टंट (०१ महिलांसाठी + ०१ सर्वसाधारण) | २ | ४८ | २१.६० | २.०० |
| २ | इलेक्ट्रॉनिक्स मेकॅनिक (०१ महिलांसाठी + ०१ सर्वसाधारण) | २ | ४८ | २६.४० | २.०० |
| ३ | टुल ॲण्ड डायमेकर (डाईज ॲण्ड मोल्ड) | २ | ४० | १०८.०० | २.०० |
| ४ | मेकॅनिक मोटार व्हेईकल | २ | ४० | ४८.०० | २.०० |
| ५ | मेकॅनिक ऑटो बॉडी रिपेअर | २ | ४० | ४८.०० | २.०० |
| ६ | मेकॅनिक ऑटो बॉडी पेंटींग | २ | ४० | २४.०० | २.०० |
| ७ | फिटर | २ | ४० | १३.२० | २.०० |
| ८ | इलेक्ट्रीशियन | २ | ४० | ८.४० | २.०० |
| ९ | वेल्डर (GMAW & GTAW) | २ | ४० | १४.४० | २.०० |
| | **एकूण** | **१८** | **३७६** | **३१२.००** | **१८.००** |

**प्रपत्र ब**

**पदांचा तपशिल**

**शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्था, येरवडा, ता.हवेली, जि.पुणे (व्यवसाय अभ्यासक्रम-९, अभियांत्रिकी तुकडया-१६, बिगर अभियांत्रिकी तुकड्या-२, एकूण तुकड्या-१८)**

| अ. क्र. | पदनाम | वेतनश्रेणी | पदांची मानके | सुधारीत आकृतीबंधानुसार मंजूर पदे |
|---|---|---|---|---|
| १ | प्राचार्य | एस-२० : ५६१००-१७७५०० | १ | १ |
| २ | गट निदेशक | एस-१५ : ४१८००-१३२३००<br>एस-१७: ४७६००-१५११००<br>(वरिष्ठ श्रेणी) | प्रत्येकी ८ तुकड्यां करिता-१ | २ |
| ३ | शिल्प निदेशक | एस-१४ : ३८६००-१२२८००<br>एस-१५ : ४१८००-१३२३००<br>(वरिष्ठ श्रेणी)<br>एस-१७: ४७६००-१५११००<br>(निवडश्रेणी २० % पदांकरिता) | प्रत्येक तुकडी करिता-१ | १८ |
| ४ | गणित तथा चित्रकला निदेशक | एस-१४ : ३८६००-१२२८००<br>एस-१५ : ४१८००-१३२३००<br>(वरिष्ठ श्रेणी)<br>एस-१७: ४७६००-१५११००<br>(निवडश्रेणी २० % पदांकरिता) | प्रत्येकी ८ अभियांत्रिकी तुकड्यां करिता-१ | २ |
| ५ | मुख्य लिपिक | एस-१३ : ३५४००-११२४०० | १ | १ |
| ६ | भांडारपाल | एस-१० : २९२००-९२३०० | १ | १ |
| ७ | वरिष्ठ लिपिक | एस-८ : २५५००-८११०० | ३ | ३ |
| ८ | लिपिक-नि-टंकलेखक | एस-६ : १९९००-६३२०० | ३ | ३ |
| | **एकूण** | | | **३१** |

## बाह्ययंत्रणेद्वारे उपलब्ध करुन घ्यावयाचे मनुष्यबळ

| अ. क्र. | पदनाम | पदांची मानके | सुधारीत आकृतीबंधानुसार आवश्यक मनुष्यबळ |
|---|---|---|---|
| १ | चतुर्थश्रेणी कर्मचारी | ४ | ४ |
| २ | पहारेकरी | ३ | ३ |
| ३ | सफाईगार | २ | २ |
| | **एकूण** | | ९ |

प्रपत्र - क

**येरवडा, ता.हवेली, जि.पुणे येथील नवीन औ.प्र.संस्थेसाठी आवश्यक आवर्ती व अनावर्ती खर्चाचा तपशिल**

(रु. लाखात)

| | आवर्ती बाब | | अनावर्ती बाब | | |
|---|---|---|---|---|---|
| अ. क्र. | बाब | आवश्यक तरतूद | अ. क्र. | बाब | आवश्यक तरतूद |
| १ | वेतन | २१३.४६ | १ | यंत्रसामुग्री व हत्यारे | ३१२.०० |
| २ | विद्यावेतन | १.३५ | २. | टूलकिटस | १८.०० |
| ३ | कच्चा माल | ९.०२ | | | |
| ४ | कार्यालयीन खर्च व प्रवास खर्च, इतर खर्च | १.८० | | | |
| | **एकूण** | **२२५.६३** | | **एकूण** | **३३०.००** |
| | **एकूण आवर्ती व अनावर्ती खर्च** | | | | **रू.५५५.६३** |